<u>विधानमंडळ कामकाज प्राथम्य</u>

**विधानमंडळाच्या अधिवेशनाच्या काळात सभागृहाच्या अधिकारी गॅलरीमध्ये मंत्रालयीन विभागांच्या सचिव दर्जाच्या व अन्य संबंधीत अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: विमंअ-२०१५/प्र.क्र.७४/पाच,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १८ मे, २०१५

<u>वाचा :-</u>

१) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक-विमंअ-२०१५/प्र.क्र.३५/पांच, दिनांक : ३ मार्च, २०१५.
२) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक-विमंअ-२०१५/प्र.क्र.३६/पांच, दिनांक : ४ मार्च, २०१५.
३) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक-विमंअ-२०१५/(१)/प्र.क्र.५०/पांच, दिनांक : ३० मार्च, २०१५.

<u>प रि प त्र क</u>

महाराष्ट्र विधानमंडळाच्या अधिवेशन काळात सभागृहाच्या अधिकारी गॅलरीमध्ये सचिव दर्जाच्या व कामकाजाशी संबंधित अन्य अधिकाऱ्यांनी उपस्थित राहण्याबाबतच्या आणि विधानमंडळाशी निगडीत कामकाज विहीत मुदतीत पूर्ण करण्याबाबतच्या सूचना महाराष्ट्र विधानमंडळाच्या प्रत्येक अधिवेशनाच्या प्रारंभी तसेच, आवश्यकतेनुसार अधिवेशनाच्या काळातदेखील, या विभागाच्या प्रधान सचिवांच्या स्तरावर, तसेच, अशा सूचना मा.मुख्य सचिव महोदयांच्या स्तरावरदेखील देण्यात येतात. त्यानुसार, नुकत्याच झालेल्या सन २०१५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनामध्ये प्रस्तुत सूचना उपरोक्त शासन परिपत्रकांन्वये देण्यात आलेल्या आहेत. तसेच, विधानमंडळ सभागृहातील चर्चेच्या वेळेस उपस्थित केलेल्या मुद्यांबाबतची माहिती मा.मंत्री/ राज्यमंत्री महोदयांना तात्काळ देण्याबाबतच्या सूचना देखील उपरोक्त अ.क्र. ३ येथील परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. दिनांक १२ मे, २०१५ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत उपरोक्त विषयाबाबतचा मुद्दा चर्चेला आला असता, त्याअनुषंगाने सर्व विभागांच्या सचिवांना आणि इतर संबंधीत अधिकाऱ्यांना त्यांच्या विभागाशी संबंधित कामकाजाच्या वेळेस सभागृहाच्या अधिकारी गॅलरीतील उपस्थितीबाबत तसेच, सभागृहात दिलेल्या **<u>आश्वासनांच्या</u>** पूर्ततेची कार्यवाही **<u>तात्काळ</u>** करण्याबाबत, सूचना देण्याचे निर्देश मंत्रिमंडळाने दिले आहेत.

३. पुर्व परिच्छेदांत नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता, सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव व संबंधीत अधिकारी यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, विधानमंडळ अधिवेशन काळात सभागृहात ज्या दिवशी त्यांच्या विभागांशी संबंधीत महत्वाचे प्रश्न, लक्षवेधी सूचना, अर्धा तास चर्चा, अर्थसंकल्पीय मागण्यांवरील चर्चा व मतदान आणि इतर महत्वाचे कामकाज असेल, त्या दिवशी त्यांनी सभागृहातील अधिकारी गॅलरीमध्ये उपस्थित रहावे. तसेच, सभागृहातील चर्चेमध्ये उपस्थित होणाऱ्या मुद्यांबाबतची माहिती त्यांच्या मा.मंत्री/ राज्यमंत्री महोदयांना **तात्काळ** उपलब्ध केली जाईल, याबाबत सर्वांनी दक्षता घ्यावी. तसेच, सभागृहातील कामकाजामध्ये मा.मंत्री/ राज्यमंत्री महोदयांनी दिलेल्या आश्वासनांची पूर्तता करण्याची कार्यवाही **तात्काळ** करावी.

४. उपरोक्त सूचनांचे सर्वांनी काटेकोरपणे अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०५१८१७२१४४१८१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAYEED MOHAMMAD AKRAM

Digitally signed by SAYEED MOHAMMAD AKRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY,CID - 917947, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAYEED MOHAMMAD AKRAM
Date: 2015.05.18 17:28:29 +05'30'

**(एम.ए.सईद)**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. उप सचिव, मुख्य सचिव कार्यालय, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. सर्व मंत्रालयीन विभाग.
६. निवड नस्ती.